**विमानचालन संचालनालयातील वैमानिक (विमान) यांना मूलभूत प्रशिक्षणासाठी पाठविणेबाबत .**

**महाराष्ट्र शासन**
**सामान्य प्रशासन विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः विचासं १११४/प्र.क्र.१०३/२८ अ**
सामान्य प्रशासन विभाग,हुतात्मा राजगुरु चौक, मादाम कामा रोड,
मंत्रालय, मुंबई ४०००३२
तारीख: २९ जुलै, २०१५

**प्रस्तावना -**

केंद्र शासनाच्या डिजीसीएच्या नियमानुसार भारतातील प्रत्येक नागरी वैमानिकास त्या त्या जातीच्या हवाई वाहनाचे मुलभूत प्रशिक्षण घेणे आवश्यक आहे. त्यानुसार विमानचालन संचालनालयामधील नव्याने नियुक्त करण्यात आलेल्या वैमानिक (विमान), कॅ. अवतार सिंग यांना प्रशिक्षणासाठी परदेशी पाठविण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय -**

विमानचालन संचालनालयात कार्यरत कॅ. अवतार सिंग, वैमानिक (विमान) यांना शासकीय विमान सायटेशन ५६० एक्सएलएस व्हीटीटी-व्हीडीडी या विमानाच्या मूलभूत प्रशिक्षणासाठी त्यांच्या नावापुढे नमूद केलेल्या कालावधीमध्ये परदेशी प्रशिक्षणास जाण्यास शासनाची मान्यता देण्यात येत आहे.

| अ. क्र. | वैमानिकाचे नाव | कालावधी | प्रशिक्षणाचा प्रकार | प्रशिक्षणाचे ठिकाण |
|---|---|---|---|---|
| ३. | कॅप्टन अवतार सिंग, वैमानिक (विमान) | २४ दिवस +२ दिवस | मूलभूत प्रशिक्षण | सीएई-युनायटेड किंग्डम |

उपरोक्त प्रशिक्षणासाठीच्या खर्चाचे विस्तृत परिशिष्ट सोबत जोडण्यात आले आहे.

२. उक्त प्रशिक्षणासाठी होणारा खर्च $ २३८००.०० हा पुढील लेखाशीर्षाखालील सन २०१५-१६ या आर्थिक वर्षाच्या मंजूर तरतूदीतून भागविण्यात यावा व त्याच लेखाशीर्षाखाली खर्ची टाकण्यात यावा.

मागणी क्र. ए-४,
२०७०, इतर प्रशासनिक सेवा
(००)(११४) परिवहन साधनांची खरेदी व परिरक्षण
(००)(०२) विमान चालन सल्लागार, महाराष्ट्र शासन
(२०७० ०१५६) ५० इतर खर्च

तसेच उक्त प्रशिक्षणासाठीचा आनुषंगिक निवास खर्च $ २८८०.०० व दैनिक भत्ता खर्च $२६००.०० आणि प्रवास खर्च रू.१,६२,०००/- असा एकूण $ ५४८०.०० + रू.१,६२,०००/- हा खालील लेखाशीर्षाखालील सन २०१५-१६ या आर्थिक वर्षाच्या मंजूर तरतूदीतून भागविण्यात यावा; व त्याच लेखाशीर्षाखाली खर्ची टाकण्यात यावा.

मागणी क्र. ए-४,
२०७०, इतर प्रशासनिक सेवा
(००)(११४) परिवहन साधनांची खरेदी व परिरक्षण
(००)(०२) विमान चालन सल्लागार, महाराष्ट्र शासन
(२०७० ०१५६) ११ प्रवास खर्च

३. याप्रित्यर्थ संचालक विमानचालन संचालनालय यांना नियंत्रक अधिकारी व सहाय्यक संचालक, विमानचालन संचालनालय यांना आहरण व संवितरण अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत आहे.

४. सदर शासन निर्णय विमानचालन संचालनालयाशी संबंधित मा. मुख्य सचिवांच्या अध्यक्षतेखालील शक्ती प्रदत्त समितीच्या दि.२५.६.२०१३ च्या बैठकीतील निर्णयानुसार निर्गमित करण्यात येत आहे.

५. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१५०७२९१५४५१९१८०७ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

SAMEER ANANT SAWANT

Digitally signed by SAMEER ANANT SAWANT
DN: c=IN, o=Government of Maharashtra, ou=General Administration Dept, postalCode=400032, st=Maharashtra, cn=SAMEER ANANT SAWANT
Date: 2015.07.29 15:51:08 +05'30'

**(समीर सावंत)**
अवर सचिव, महाराष्ट्र शासन

सोबत :-परिशिष्ट १

**प्रत,**

१) संचालक / उप संचालक, विमानचालन संचालनालय, मुंबई.
२) कॅप्टन अवतार सिंग, वैमानिक,विमानचालन संचालनालय, मुंबई.
३) मा.मुख्य सचिव यांचे उप सचिव, मंत्रालय, मुंबई.
४) अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई.
५) निवासी लेखा परिक्षा अधिकारी, मुंबई.
६) महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता) (लेखा परीक्षा) महाराष्ट्र राज्य, मुंबई.
७) वित्त विभाग (व्यय -४) मंत्रालय, मुंबई.
८) निवड नस्ती, कार्यासन २८-अ, सामान्य प्रशासन विभाग, मंत्रालय, मुंबई.

**शासन निर्णय क्रमांकः विचासं १११४/प्र.क्र.१०३/२८ अ, दिनांक २९ जुलै, २०१५**
**सोबतचे परिशिष्ट १**

**शासकीय विमानाच्या प्रशिक्षणासाठी लागणा-या खर्चाचे विस्तृत विवरणपत्र**

| | |
|---|---|
| प्रशिक्षणाचे ठिकाण | सीएई, युनायटेड किंग्डम |
| हवाई वाहन | शासकीय विमान सायटेशन ५६० एक्सएलएस व्हीटीटी-व्हीडीडी |
| प्रति वैमानिक प्रशिक्षण खर्च | $ २३८००.०० |
| प्रशिक्षणाचा कालावधी | २४ दिवस |
| प्रवासाचे दिवस | २ दिवस |
| प्रति व्हिसा खर्च | रू.१२,०००/- |
| प्रति प्रवास खर्च | रु. १,५०,०००/- अथवा प्रत्यक्ष खर्च या पैकी जो कमी असेल तो |
| निवास खर्च | प्रती दिवस $ १२०.०० अथवा प्रत्यक्ष खर्च (जो कमी असेल तो) (एकूण दिवस २४)<br>२४ X $ १२० = $ २८८०.०० |
| दैनिक भत्ता | प्रती दिवस $ १००.००<br>एकूण दिवस (२४+२)<br>२६ X $ १०० = $२६००.०० |
| प्रति वैमानिक एकूण खर्च | $ २९२८०.००+ रु.१,६२,०००/- |
| | **$ २९२८०.०० + रू.१,६२,०००/-** |

SAMEER ANANT SAWANT

Digitally signed by SAMEER ANANT SAWANT
DN: c=IN, o=Government of Maharashtra, ou=General Administration Dept, postalCode=400032, st=Maharashtra, cn=SAMEER ANANT SAWANT
Date: 2015.07.29 15:51:28 +05'30'

**(समीर सावंत)**
अवर सचिव, महाराष्ट्र शासन